



संपादिका

रेणुका (रेपाळ) खटावकर-पुणे.

सुप्रिया (जोशी) जाधव-पुणे.

आपल्या प्रतिक्रिया आम्हाला जरूर कळवा esahity@gmail.com

प्रिय रसिक नवरा-बायकोहो....आपल्या उत्स्फुर्त  प्रतिसादाने प्रोत्साहीत होऊन आम्ही पुन्हशः आपल्या भेटीस येतोय (सावधान !!!)

या भण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्ण्णाट विनोदी अंक्कासह......

“नवरआआआआआआआआआ-बायक्ओओओओओओओओओ रिटर्न्स”

आणि हो..........अधुन-मधुन कोपरखळी मारणा-या “खास” ऊखाण्यांची बरसात.....ह्या लग्नसराईत कामास येईल......



अगदी कोणताचं ऊखाणा आठवला नाही  ऐनवेळी  तर.......तर.......बिनधास्त हा फ़ेका........

“नावामधे काय आहे ? नका हट्ट धरु ,
-------च्या नावाचा ऊखाणा जुळत नाही , मी काय करु ?”

हे.....हे......हे........

साधी ’बाईक’ घेताना कोण चौकस असतो आपण......’ॲव्हरेज’ किती ? किती खर्चीक पडेल ?
(नाका पेक्षा मोती जड तर नाही ?)
रंग-रुप , ’मॉडेल’ (ओल्ड कि लेटेस्ट ) वैगरे वैगरे .........
अन ’वाईफ़’ निवडताना तर चोखंदळ असणारचं हो प्रत्येकजण !
( अर्थात जेव्हा निवड चुकल्याचा साक्षात्कार होतो तेव्हा वेळ निघुन गेलेली असते म्हणा.)
असो.....



आदर्श बायको असावी तरी कशी ????

# बायको........

अशी आपली  बायको असावी – हजारजणीत उठुन दिसावी
तिलामात्र त्याची , थोडीसुध्दा मिजास नसावी

अशी आपली  बायको - भक्कम पगाराची , कायम नोकरीची असावी
मला हवी तेव्हा मात्र ती मला घरीचं दिसावी

अशी आपली  बायको  –  चतुर ,शहाणी , स्वाभिमानी असावी
माझ्यापुढे नम्रतेने  मान तिने सदैव तुकवावी

अशी आपली  बायको  –  सभेत धीट , कामाला वाघ असावी
माझ्यासाठी , घरीदारी , ती गरीब गाय असावी



अशी आपली  बायको  –  'बोले तैसे चालणारीचं' असावी
लग्नाआधी मी दिलेल्या वचनांची  आता तिला आठवण नसावी

अशी आपली  बायको  –  सदैव हसतमुख , प्रसन्न असावी
माझ्या आक्रस्ताळेपणबद्दल भाळी तिच्या आठी नसावी

अशी आपली  बायको  –  शांत , गंभिर , पोक्त असावी
माझ्या  बालिशपणाबद्दल तिची काही प्रतिक्रीया नसावी

अशी आपली  बायको  –  व्यवहारी , काटकसरी असावी
उधळमपट्टीवर माझ्या तिची बारीक नजर नसावी

अशी आपली  बायको  –  एक आदर्श गृहीणी असवी
ढिसाळपणाबद्द्ल माझ्या तिची कसलीचं तक्रार नसावी

अशी आपली  बायको  –  सुसंस्कृत  माता  असावी
बेबंद माझ्या वागण्याची मुलाबाळांवर साऊली नसावी



अशी आपली  बायको असावी  – व्यतिरिक्त माझ्या नजर तिची कुठे न ठरावी
आमच्या ’इकडे-तिकडे’ बघण्याला  मात्र तिची कधीचं हरकत नसावी.
-सतिश वाघमारे.

तरीही अपेक्षांना थोडी ( ? ) मुरड घालून अस्मादिक आऊट होतातचं की !!!

“शंकरनगर ग्राउंडवर खेळत होतो क्रिकेट ,
---------ला बघुन पडली माझी विकेट.”



’ती’ ही काही कमी चिकीत्सक नसते , दहा ’शॉपिंग मॉल’ उंडगल्यावर एक ’जिन्स’ कशीबशी तिच्या पसंतीस उतरते.

तर नवरा या प्राण्याबद्द्ल तिच्याही काही ख़ाआआआआस अपेक्षा असणं स्वाभाविकचं!!!

अस्साचं हवा.....नि.....तस्साचं नको.

नवरा नको गं बाई.......

काय म्हणावं हीला..... कसली ही पोर.....
लावी आईबापाच्या..... जीवाला घोर.....
लावी आईबापाच्या..... जीवालाआआआ घोरअअअ.....
लई शिकूनी मोठी झाली..... म्हणे नवरा नको गं बाई........
नवरा नको गं बाई........ असला नवरा नको गं बाई...........

ज्याला नाही लाखाचा पगार.......
ज्याला नाही स्वतःचं घर.......
ज्याच्या माथी कर्तव्याचा भारअअअ......
असला नवरा नको गं बाई....... हिला नवरा नको गं बाई.......
नवरा नको गं बाई....... हिला नवरा नको गं बाई......





सासू-सास-यांचा हीला त्रास......

नको नणंदा भावजयांचा जाच......

ज्याच्या घरी सा-यांचाचअअअ वास......

असला नवरा नको गं बाई...... हिला  नवरा नको गं बाई......

नवरा नको गं बाई...... हिला  नवरा नको गं बाई......

जो सणाला माहेरी नेणार नाही.....

दागिने साड्या घेणार नाही.....

जो  गाडीचा हट्ट पुरवणाआआर नाही.  ....

असला नवरा नको गं बाई...... हिला  नवरा नको गं बाई......

नवरा नको गं बाई...... हिला  नवरा नको गं बाई......

ज्याने बघा निर्धार केला.....

नोकरी सोडून व्यवसायात गेला.....

ज्याचा जम अजुन नाहीईईई बसला.....

असला नवरा नको गं बाई....... हिला  नवरा नको गं बाई.......

नवरा नको गं बाई...... हिला  नवरा नको गं बाई......

वय चाललया वाढत.....

बसलीया नाक मुरडत.....

मग बसशील बघ रडत.....



नवरा हवा गं बाई...... कसला नवरा हवा  गं बाई......

नवरा हवा गं बाई...... कसला नवरा हवा  गं बाई......

राजा-राणीचाच संसार हवा.....

लाखभर पगार अन बंगला नवा.....

डझनभर नोकर-चाकरांचा थवा......

नवरा हवा गं बाई...... असला नवरा हवा गं बाई.......

नवरा हवा गं बाई...... असला नवरा हवा गं बाई...

-अमरीश अ. भिलारे

तरीही डोंगर पोख़रुन शेवटी हाती काय लागते ......तर.......असो !!!



"भारताने आकाशात सोडले मोठे यानं ,
------च्या पदरी पडले-----चे ध्यानं."

एकदाचे हात पिवळे (पोळून काळे-निळे) झाले , नव्याची नवलाई उतरणीला लागली की
नुसती तुलनाचं नशिबी उरते बाकी......
कारण तोवर पूर्वाश्रमीची प्रेयसी कुणाची तरी बायको झालेली असते ......

बायको आणि प्रेयसी.....

प्रेयसी म्हणजे......
ओऍसिस वाळवंटातलं,
बायको म्हणजे......
पाणी रोजचं , नळातलं !

प्रेयसी म्हणजे......
फ़र्मास लावणी,
बायको म्हणजे.....
प्रबंधाची बांधणी !



बायको म्हणजे बर्फ़
प्रेयसी विस्तव ,
प्रेयसी म्हणजे स्वप्न
बायको वास्तवं !

कविता स्वप्नांवर होतात
वास्तवावर नाही,
वर्षातल्या दिवाळीचं कौतुक
रोजच्या दिवेलावणीचं नाही !

पण एक मात्र ख़रयं यार हो......

प्रेयसी सोडून जाते
आणि “ही”चं जवळ असते,
कविता नाही केली हीच्यावर
तरीही “ही”हाताशीचं रहाते !

-डॉ.अशोक कुलकर्णी.



नि मग 'ती' ही आपली आगतिकता असे नांव घेवून (ठेवून) व्यक्त करते.......

"बैलांच्या पुजेचा सण  असतो पोळा ,
-------रावांचं नावं घेते ------रावांवर डोळा."

बाकी एकदा असा हा बैलोबा गळयात पडल्यावर तिच्यातरी हातात दुसरे काय ऊरणार हो ?
ऊखाणे घेण्याशिवाय ? अं ???

पाळीव
माझ्या सेन्सीटीव्हीटिची
तू गेंड्याच्या कातडीशी केलेली तुलना
रोज नवीन  प्राण्यांची नावे देऊन
हक्कानं केलेली कचकट अवहेलना
आता माझ्या पूर्ण अंगवळणी पडलीये
मी पाळीव नवरा असल्याची गोष्ट
आता जनावरांनाही कळलीये
-शशांक प्रतापवार.



बैल , घोडा , हत्ती....शेवटी संसार तडीस नेणे म्हणजेही एक सर्कसचं !!!
जाऊदे झाले ......प्रेमात नि युध्दात (लग्नात) सगळं माफ़ असतं म्हणे.......

## पुरुष आणि डुक्कर

माझ्यावरती रागावली की ती प्रेमाने मला डुक्कर म्हणते

परवा दिवशी ती इतक्या लाडानी मला डुक्कर म्हणाली की
पलिकडच्या चिखलातलं एक डुक्कर लाजलं
आणि एका बाईकडे बघून लाजला म्हणून
त्याच्या बायकोशी त्याचं वाजलं



त्याची बायको त्याला म्हणाली
अरे लाज वाटते का तुला, काल तर म्हणालास की माझ्या सोबत खुश आहेस
पण तू काही सुधारणार नाहीस
डुक्कर कसला पुरुष आहेस

तिनी त्याला पुरुष म्हणू देत किंवा हिनी मला डुक्कर
ही तर प्रेमाची हाक आहे
पण माणूस व्हा नाहीतर डुक्कर
शेवटी बायको म्हणजे धाक आहे



-धुंद रवी

"हिरव्या हिरव्या शेतात झेंडुचे फुल ,
आमचे ----- राव जसे डुकराचे मुलं."




हे !!! हे !!! हे !!!

तुमची 'ही' घरी नसेल तर कसे-कसे नि कुठे-कुठे अड्ते ह्याचे रसभरीत् गुणगान 'ख-यांची'
साक्ष काढतं करण्यात कोणीही बहादद्र मागे हटणार नाही....
मात्र तुषारदांसारखा कबुलीजबाब....... विरळाचं !!!

विडंबन- “असतेस घरी तू जेव्हा....”
संदीप खरे यांची माफ़ी मागुन.

असतेस घरी तू जेव्हा....
जिव पुन्हा पुन्हा धडधडतो
जगण्याचे होती वांधे
मी घरामधे तडफ़डतो.

तव देह कितेक किलोचा
जेव्हा तू घेऊन येते
ही धरा कापते थरथर
बघ जीव कसा हादरतो.

येतात मित्र दाराशी
तुज बघुन पळती बाई
एखादा पेग सुखाचा
घेण्याचा क्षण ना मिळतो.



तव मिठीत धडपडणारी
माझी ही बिचारी काया
श्वासाविण हृदय अडावे
मी तसाचं अगतिक होतो.

तू सांग सखे मज काय
मी सांगू या घरदारा
तू गेल्यावर इथला कणकण
आनंदुन नाचत सुटतो.

ना अजुनी झालो मोठा
ना धीटही अजुनी झालो
ते वटारता तू डोळे
मग शरण तुला मी असतो.

-तुषार जोशी.



“पुण्यासाठी  शनिवारवाडा आणि भाषेसाठी मराठवाडा ,
------शी लग्न करुन कसा-बसा ओढतोय  संसाराचा गाडा.”

शेवटी कीतीही नाही म्हंटल तरीही  पोटातलं ओठात येतेचं हो !!!

सहनशिलतेलाही मर्यादा  असते हे रास्तचं .......तरीही ’सुबह का भुला.......’ म्हणून माफ़ करावं , हो की नाई ?

पण छे !!! अशी सहजासहजी माफ़ करेल तर ती बायको कसली ? चौकशा , निष्कर्श , अहवाल हा जणू ’ही’चा लग्नसिध्द हक्कचं !



# चौकशी अहवाल

नव-यावर  विश्वास नसतो,
बाकी जगाचा  मात्र आदर करते
नव-याच्या चौकशी अगोदरच
बायको कृती अहवाल सादर करते

बायकोचा एक  सदस्यीय आयोग
तसा पूर्वग्रहदुषित असतो
ठरवून  काढलेला निष्कर्ष
नवरा बिचारा सोशित असतो

-सूर्यकांत डोळसे.



नवरोबाही काही कमी लटपटी-खटपटी करणारे नसतात हं !

“यमुनेच्या तटावर पडते ताजमहालाची साऊली ,
--------ना जन्म देणारी ’धन्य, धन्य’ ती माऊली !”

असे म्हणायची पाळी येते प्रत्येकीवर.......आता हीचं ’केस’ पहा ना ..........



## भलतीचं अवघड ’केस’.....

शर्ट पुढे करुन विचारले , हा कोणाचा रे केस ?

कशी ही बया न जाणो लावते माझा ’ट्रेस’
कसे समजाऊ हिला, ही भलतीचं अवघड ’केस’

बघ राणी हा तुझाचं तर केस
तुझ्या केसासारख़ाचं काळा.....
घेऊन मुरका, म्हणाली नीट पहा
माझ्या केसांचा रंगचं निराळा.....
आई! झेपेल तेचं कर, पण करु नको तु ’गेस’
सांग देवा सांग, कसे करु हिला मी ’फ़ेस’ ?



ऐक तरी , तूचं बघ ना जरा
तुझ्या केसांसारखाचं लांबडा....
अरे चल ,माझ्या केसांपेक्षा
हा आखुडचं आहे की थोडा...
समजावताना हिला ,तोंडी येतोय माझ्या फ़ेस
नको रे देवा माझं ,'लाईफ़' असं करु तू 'मेस'

तुझ्यासारख़ा हा सरळ-साधा
असं म्हणून कानात केला वादा.....
हसून म्हणे ,'डाय' कमी पडला असेल
एखादा केस वाढलाही नसेल.....
उपयोगी पडला महाराजा, अखेर 'डायमंडचा नेकलेस'....
तूचं रे देवा , तूचं सर्वांहून 'बेस्ट' मिटली माझी 'केस'
तूचं सर्वांहून 'बेस्ट'.



-रेणुका (रेपाळ) खटावकर.

“इकडे डोंगर तिकडे डोंगर, मधे कुत्र भुंकतं ,
---------रावांना पाहून डोकं माझ उठतं.”

पण काय करणार डोकं उठुन ? पावसानं झोडपलं.....नव-यानं बडवलं......हेचं खर गं बाई !

कवियत्रींच्या नव-यांचे तर अस्से हाल होतात.......’कविता नको पण ऑर्कुट आवर’ असे म्हणायची पाळी येते बिच्चा-यांवर !



## ऑर्कुटवरच्या सखीजनांची माफ़ी मागुन !!!

ऑर्कुटवरती सा-या सख्या जमल्या
जरा नव्या नव्या खबरीत रमल्या
हे कसे ? ते कसे ? अय्या !! आणि अग्गं !!
“ आमचे ’ हे ’रात्री अस्स्स्स्स्स्स्स्स्स्स्से घोरतात ”
रात्रभर झोप नाही बघ गं.........

चल गं आता जाते  बाई
आमच्या ’यांना’ जेवणाची घाई
थांब गं जरा..... गप्पा मारु शांत
स्वयंपाक होईल की निवांत ?



अग्ग.....तुझी कालची कविता छान होती
पण ......मागच्यापेक्षा थोडी लहान होती
अगं......तुझीही कविता  छानचं होती......
खरं सांगु ? ती माझ्या मनाचं पानचं होती

आता काय करतेयस ?
तांदूळ धुतेयं.......
मग ,आता काय करतेयस ?
कुकर लावतेयं.......
नंतर काय करतेयसं ?
कणिक मळतेयं......
अर्धा चॅटवर बाकिचा गॅसवर
असा यांचा स्वयंपाक चालतो......

नवरा मात्र मनातल्या मनात
ऑर्कुटला दोन-चार शिव्या घालतो.

-सचिन काकडे.



आ........हा ......... काय पण तक्रार !!!




“नशिबी माझ्या ...चुल-मुल-नोकरी, घराचा हप्ता
मी राबते घरी-दारीं------बसून खातो आयता.”

नवरेही काही कमी नाहीत  हं ! शेवटी देवालाचं साकडं घालाव लागत बघा......

# काय सांगु बाप्पा !!!

हप्ता-हप्ता कामासाठी दौ-यावर थे जातेत
आन घरी आले का त्या कामप्युटरवर
जावुन बसत्येतं
घरात कोनी हाय ह्याची सुध त्याहीले नसते
काय सांगु बाप्पा , हे असे काहुनचं वागतेत....

मया मंतू चले बिगबाजाराले जावू
जरासक उलिसक भटकुन बी येवू
तर म्हंते कसे
माही कबंर हाय दुखते.............

आन दोस्ताचा फ़ोन येते त रातभर ऊंडाराले जाते
काय सांगु बाप्पा , हे असे काहुनचं वागतेत...

गावभरच्या लोकांशी फ़ोनवर गुलुगुलु  बोलतेत
दुनियादारीसाटी लई टाईम ह्याईले रहातेय
आन मी म्हनलं का
चाल माह्या भैनीकडे जावू...............
तं बुवा वसकन माह्यावर धावूनचं येते
काय सांगु बाप्पा , हे असे काहुनचं वागतेत...

-सुनिल जोशी.

काय मेला एक-एक जाचं हा........’धरलं तर चा्वतं .....नि सोडलं तर पळतं ’

“खारीकेत बाई खारीक..........’पठाणी खारीक’,
----------च्या जाचाने मी  झाले बारीक.”



गडाडणारे ढग,  कडाडणा-या विजा, घोंगवणारं वादळ  घरात घुसलं तर ?

वादळ

उन्मत्त
थैमान घालणारं
थरकाप उडवणारं
दणाणत मेघगर्जनेने सारा आसमंत
सृजन करत
जलबंबाळ  करतं वसुधा

चेतावणी मिळो न मिळो
नुकसान ठरलेलंच

तसा चकवाही
बेभरवशाचं

तरीही,
त्याने उभारलेल्या इंद्रधनुवरनं घसरत



पहातच रहावसं वाटतं त्याचं तांडव

दुरुनच

वादळाला कुणी घर देत नाही
निदान मी तरी

नवरा कवी आहे
तेच पुरेसं

-स्वप्ना कोल्हे.

बाकी संसार म्हणजे एव्हडी करबुर चालायचीच हो !
खमंग फ़ोडणी शिवाय  आमटी-भाजी जशी बेचव तसाच या लुटुपुटुंच्या भांडणा शिवाय
संसार ही निरस वाटेल होय न?

“अरे संसार संसार
दोन्ही जीवाचा सुधार
कधी नगद उधार
सुखदुःखाचा बेपार .”
-बहिणाबाई चौधरी.

चला तर मग हा खुमासदार किस्सा ऐकून  पोटभर हसून घेऊया.....

मैत्री !!!!!



स्त्रियांच्या मैत्रीपेक्षा पुरुषांची मैत्री जास्त घट्ट असते.......
कसे ????
असे कसे विचारता ????
कसे ते पहा.........

एकदा एक  बायको संपुर्ण रात्रभर घरीचं येत नाही
दुस-या दिवशी नवरा विचारतो तेव्हा ती सांगते "अरे ! मी एका मैत्रिणीच्या घरी राहिले होते."

नव-याचा तीच्या शब्दांवर विश्वास बसत नाही .
तो तिच्या सर्वात जवळच्या वीस मैत्रिणींना फ़ोन करतो.

ती काल आपल्याकडे आलीचं नव्हती असेचं वीसही जणी सांगतात......

१० दिवसांनंतर.........................



आता जेव्हा नवरा  संपूर्ण रात्रभर घरीचं येत नाही तेव्हा काय होते ते पहा,दुस-या दिवशी
सकाळी बायको विचारते तेव्हा तो सांगतो "अगं! मी एका मित्राच्या घरीचं  होतो."

बायकोचा नव-यावर विश्वास बसत नाही .
ती त्याच्या सर्वात जवळच्या वीस मित्रांनां फ़ोन करते.

त्यातले दहा जण  छातीठोकपणे सांगतात कि काल रात्री तो त्यांच्याचं घरी होता.

आणि......आणि.......आणि.......

उरलेले दहा जण तर तो आत्ताही आपल्याचं घरात आहे असेही सांगून टाकतात!!!!!!

आत्ता बोला ??????

-...............................



ईश्य !!!!! आता हे  शेवटचंचं नावं (ठेवणारं) घेणार हं मी !

“लग्नाला आले नटून-थटून, नेसले साडी पिवळी
आग्रहाचा भरवतेय घासं पण---------रावांनी लावलीय कवळी .”





# ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

नेटाक्षरी
स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम
बालनेटाक्षरी

## प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

टल्लीची शाळा
मकरंदच्या त्रिवेण्या
ग्रेव्हयार्ड लिटरेचर
चार क्षण
तो आणि ती
प्रियेचे अभंग
देशी दारुचे दुकान-3D
ई-शाळा
तो, मी आणि सिगरेट



संपर्क - अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी
esahity@gmail.com